अल्पसंख्याक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या मुलींच्या वसतिगृहाच्या बांधकाम व दुरुस्तीकरिता निधी उपलब्ध करणेबाबत.....

सन २०२४-२५ करिता निधी वाटप

महाराष्ट्र शासन
अल्पसंख्याक विकास विभाग
**शासन निर्णय क्रमांकः वसगृ २०२४/प्र.क्र.२४ /का.८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक : २९ मार्च, २०२५**

**वाचाः-**

१. अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र. अविवि २००९/प्र.क्र.१५/का.८, दि.०२ मार्च, २०१०.
२. अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र. वसगृ-२०११/प्र.क्र.१३०/का.८, दि.२० डिसेंबर, २०११.
३. अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र. वसगृ-२०१२/प्र.क्र.१६८/का.८, दि.२१ जून.२०१३ ,
४. अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र. वसगृ-२०१२/प्र.क्र.१६८/का.८, दि.२८ जुलै, २०१५.
५. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.: अर्थसं -२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५ जुलै, २०२४ व दि.१७ मार्च,२०२५.
६. जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांचे पत्र क्र. ससाशा/ए.के.२/२०२४, दि.२५ ऑक्टोबर, २०२४
७. जिल्हाधिकारी, वाशिम यांचे पत्र क्र. कक्ष-२१४/अल्पसं/म.स./कावि ७३/२०२४, दि. २८ ऑगस्ट,२०२४
८. जिल्हाधिकारी, परभणी यांचे पत्र क्र. २०२४/जिनिस/अल्पसंख्याक/१४३०, दि. २० सप्टेंबर, २०२४

**प्रस्तावना :-**

राज्यातील सर्व जिल्ह्यांमध्ये अल्पसंख्याक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थीनीसाठी वसतिगृहे बांधण्याबाबत संदर्भांकित क्रमांक १ येथील दिनांक २ मार्च, २०१० चा शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. राज्यातील विविध विद्यापीठांमध्ये उपलब्ध असलेल्या जमिनीवर अल्पसंख्याक मुलींसाठी वसतीगृह बांधण्यासंदर्भातील तसेच वसतीगृहांच्या व्यवस्थापनाबाबतची कार्यपध्दती संदर्भांकित क्रमांक २,३ व ४ येथील दिनांक २० डिसेंबर, २०११, दिनांक २१ जून, २०१३ व दिनांक २८ जुलै, २०१५ रोजीच्या शासन निर्णयांन्वये निश्चित करण्यात आली आहे.

२. अल्पसंख्याक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या मुलींच्या वसतिगृहाचे बांधकाम व दुरुस्तीसाठी सन २०२४-२५ करिता "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०८) शहरातील अल्पसंख्यांक समाजातील वसतीगृहाकरिता सहायक अनुदान (२२३५ ए १४२), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सुधारित अंदाजात रु.१४,००,००,००० /- इतका निधी उपलब्ध करण्यात आला आहे. संदर्भ क्र. ६ ते ८

च्या पत्रांन्वये अल्पसंख्याक विद्यार्थिनींच्या वसतीगृहाच्या बांधकाम व दुरुस्तीकरीता निधी वितरित करण्याची मागणी केलेली आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.५ च्या शासन निर्णयांस अनुसरुन सदरचा निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.५ येथील शासन निर्णयान्वये सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता असलेल्या वित्तीय बंधनाच्या मर्यादेस अनुसरुन जिल्हाधिकारी, रत्नागिरी,वाशिम,परभणी यांना त्यांच्या अधिपत्याखालील अल्पसंख्याक विद्यार्थिनींच्या वसतीगृहाच्या बांधकाम व दुरुस्तीकरीता एकूण **रु.१,७४,५९,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी चौऱ्याहत्तर लाख एकोणसाठ हजार फक्त)** निधी खालीलप्रमाणे वितरित करण्यास (अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून आहरण व संवितरण करण्यास) याद्वारे या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | वसतिगृहाचे ठिकाण | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|
| बांधकाम व दुरुस्तीकरीता | | |
| १ | शासकीय तंत्रनिकेतन, रत्नागिरी | रु.६६,७९,०००/- |
| २ | शासकीय तंत्रनिकेतन, वाशिम | रु.२६,७०,८००/- |
| ३ | शासकीय तंत्रनिकेतन, जिंतूर, जि. परभणी | रु.५१,४९,१००/- |
| ४ | औद्योगिक प्रशिक्षण संस्था, पुर्णा, जि. परभणी | रु.२९,६०,१००/- |
| **एकूण :** **( अक्षरी रुपये एक कोटी चौऱ्याहत्तर लाख एकोणसाठ हजार फक्त)** | | **रु.१,७४,५९,०००/-** |

२. सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०८) शहरातील अल्पसंख्यांक समाजातील वसतीगृहाकरिता सहायक अनुदान (२२३५ ए १४२), ३१ सहायक अनुदान ( वेतनेतर )" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर तरतूद जिल्हाधिकारी, रत्नागिरी,वाशिम,परभणी यांचेकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरीता जिल्हाधिकारी हे नियंत्रक अधिकारी आणि त्यांनी प्राधिकृत केलेले दुय्यम अधिकारी हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील.

४. सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे व खर्च मंजूर केलेल्या निधीच्या मर्यादेत ठेवण्यात यावा. केलेल्या खर्चाचा तपशील व उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) विहित मुदतीत शासनास आणि महालेखापाल कार्यालयास सादर करण्याची आणि महालेखापालांच्या लेख्याशी खर्चाचा ताळमेळ घालण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी, रत्नागिरी, वाशिम, परभणी यांची राहील. तसेच अतिप्रदान व अखर्चित निधी परतावा शासनास भरणा (जमा) करण्याबाबत वित्त विभागाच्या सूचनांनुसार संबधित जिल्हाधिकारी यांनी कार्यवाही करावी.

५. सदरचा खर्च करताना वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत C.V.C. च्या मार्गदर्शक तत्वांचा / CAG च्या निदेशानुसार कोणताही शासन निर्णय/अटी व शर्तीचा भंग होणार नाही याची दक्षता संबधित जिल्हाधिकारी यांनी घ्यावी. सदर रक्कम वितरित करण्यापूर्वी जिल्हाधिकारी यांनी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित

केलेल्या शासन निर्णय / भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांचे निरिक्षण अहवाल / वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा. सदर रक्कम चालू आर्थिक वर्षात उपयोगात आणणे आवश्यक राहील. सदर निधी कोणत्याही संस्थेत ठेव स्वरुपात जमा करता येणार नाही.

६. सदरचा खर्च मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०८) शहरातील अल्पसंख्यांक समाजातील वसतीगृहाकरिता सहायक अनुदान (२२३५ ए १४२), ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर) या लेखाशिर्षांतर्गत सन २०२४-२५ करिता उपलब्ध असलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, उपविभाग-एक मधील अट क्र.२७ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत व वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं -२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५ जुलै, २०२४ व १७ मार्च, २०२५ मधील कार्यपद्धती व अटींची पुर्तता करुन निर्गमित करण्यात येत आहे. प्रस्तावास अनौपचारिक संदर्भ क्र.४८७/१४७१, दिनांक ११ डिसेंबर,२०२४ अन्वये नियोजन विभागाची मान्यता प्राप्त झाली आहे. तसेच अनौपचारिक संदर्भ क्र.४४१/२०२४/व्यय-१, दिनांक १ जानेवारी, २०२५ अन्वये वित्त विभागाची मान्यता प्राप्त झाली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक क्र. २०२५०३२९१५१५२८४४१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by MILIND PADMANABH SHENOY
Date: 2025.03.29 15:16:23 +05'30'

**(मिलिंद शेणॉय)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१. महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखा व अनुज्ञेयता),मुंबई / नागपूर,
२. महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखा व परीक्षा), मुंबई / नागपूर,
३. जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी,वाशिम,परभणी
४. जिल्हाधिकारी, रत्नागिरी,वाशिम,परभणी
५. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, मुंबई,
६. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई
७. प्राचार्य/अध्यक्ष/संचालक (शासकीय तंत्रनिकेतन, रत्नागिरी, शासकीय तंत्रनिकेतन, वाशिम, शासकीय तंत्रनिकेतन, जिंतूर, जि. परभणी, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, पुर्णा, जि. परभणी)
८. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला, मुंबई,
९. कक्ष अधिकारी, का.७, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी उक्त रकमा संबंधिताना कृपया B.D.S. वर तात्काळ उपलब्ध करुन देण्यात याव्यात.
१०. वित्त विभाग (अर्थसंकल्प -१४, व्यय-१) मंत्रालय, मुंबई
११. नियोजन विभाग (कार्या.१४७१)
१२. निवड नस्ती, कार्यासन- ८